ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति पुढें कथा सांगत । गौतमादि मुनींच्या पुत्रांसमवेत । बाळांसम भोजन करित । गणेश्वर कौतुकानें ।।१।। ते मुनिसुत त्याचा करित । तिरस्कार अपमान तो सहन करित । हर्षभरें मित्रभाव युक्त । जैसी भूमिका तैसें वागे ।।२।। जे सख्य भक्तीस्तव आचरले । तपादिक सतत भले । ते समस्त भक्त झाले । सेवेसाठी

मु. पु. खंड. ६ अ. ३८-३९

मुनिपुत्र तैं ।।३।। कश्यपाचा सुत होत । मयूर विष्णु अव्यय जगांत । यज्ञसेवेस उद्युक्त । गणपासंगे युद्ध करी ।।४।। विनता बोध करी स्वसुतास । तो जेव्हां पटला त्यास । तो करी प्रणाम गणेशास । स्तवन करून तोषवी ।।५।। गणेशाजवळी करी याचना । मयूरवराची प्रार्थना । आधीं तुझ्या नामाची उच्चारणा । होईल माझ्या नामांत ।।६।। सर्वख्यात सर्वसिद्धिप्रद । हें असे नांव विशद । त्यावरी ख्यात मयूरेश नामें सुखद । शक्तीनों गणेश जगांत ।।७।। तो वाहन होऊन सेवारत । विघ्नपाच्या राहे सतत । एकदा द्विजपुत्र बुडवित । पाण्यांत त्या गुणेशासी ।।८।। नागकन्या काममोहित । पकडून नेती त्यास पाताळांत । गणेशमहिमा ऐकून तप आचरित । होत्या ब्राह्मणी एकविस ।।९।। पतिभावें गणेश लाभावा । हा त्यांचा संकल्प बरवा । नाना अनुष्ठानें देवा । नाना मंत्रे तोषविती ।।१०।। त्या सर्व तपः प्रभावें होत । नागकन्या लावण्ययुत । शेष वासुकी मुख्य पाळित । परमादरें लाड करिती ।।११।। त्या नागमुख्यांस सांगत । गणेशास पतित्वें मनांत । वरलें असे आम्हीं एकचित्त । अन्य कोणास न वरणार ।।१२।। तें ऐकून त्यांचें समर्थन । शेषमुख्य करिती युक्तिवचन । कां हट्ट करतां तुम्ही अज्ञान । ब्रह्मेश गणनाथ स्वानंदस्थ ।।१३।। तो तुमचा पति कैसा होईल । अभिमान सोडा होऊन सबल । आपल्या समान वर अमल । निवडावा तुम्हीं सर्वांनीं ।।१४।। त्याचे ऐकून वचन । कुमारी बोलती एकचित्त मन । ताता आम्हीं ब्रह्मचर्य स्वीकारून । घालवू आमुचें जीवन ।।१५।। परी पतित्वें गणेशास । वरूं हाचि निश्चय खास । अन्यथा ब्रह्मचर्य विशेष । सतत आम्हीं पालन करूं ।।१६।। पूर्वसंस्कार योगें पाहत । त्या नागकन्या तैं जळांत । गणनायकासी पकडून नेत । पाताळांत त्या सर्वही ।।१७।। नारदाच्या मुखांतून । ऐकलें होते वर्तमान । शिवपुत्र झाला गजानन ।

आला असे त्या प्रान्तात ।।१८।। स्वगृहीं गणनाथास नेती । त्या साऱ्या विव्हल अती । भक्तिसंयुक्त त्यास पूजिती । पति मानून शक्तींनो ।।१९।। तेव्हां तोही हृदयी इच्छित । शांतियोग तयांसी देत । तेव्हां त्या कामहीन होत । सेविती प्रभूसी विशेषें ।।२०।। त्यांसी अकृत्रिम सुख देत । भक्तिभावें संतुष्ट । रात्रंदिवस त्यांस भोगित । पौरुषसुख अत्यंत देई ।।२१।। ऐसें करून मर्दन चरित । गर्विष्ठ शेष मदयुक्त । पुनरपि तेथ जात । जेथ त्या नागकन्या द्विजसुता होत्या ।।२२।। ऐसी नानाविध कृत्यें करित । अद्भुत त्याचें चरित । गौतमाचें सर्व अन्न खात । न लोभानें तो भक्तीनें ।।२३।। भक्तांसी भक्तिदानार्थ उत्कंठित । तो प्रभु गजानन काय न करित । दासदासीपरायण श्रेष्ठ । महादेवींनो विचार करा ।।२४।। भक्तांनी जें जें केलें । तें तें यानें अमृतरूप मानलें । अभक्तांनी गौरव ढोंगें केलें । तें तें हा विषसम मानी ।।२५।। भक्तिमोहानें तिरस्कार सहत । ताडन अपमानादिक समस्त । गणनाथ तो शिवसुत । सौख्यद मानी तें मनीं ।।२६।। पार्वती शिवमुख्यादि ताडिती । तयास कश्यप अदितिही मानिती । कधीं कधीं अपमानिती । परी तें सर्व अमृत मानी ।।२७।। भक्ताच्या वचनास्तव धारण । करी दैत्य मस्तक गजानन । स्वांगच्छेद करून । मलसंभूतही तो झाला ।।२८।। इत्यादि विविध कर्मे करित । जीं नीच अन्यथा वाटत । भक्तीनें होऊन संमोहित । मोहनाशक गजानन ।।२९।। तेव्हां गौतममुख्य येती । गणेशमायेनें ते युक्त असती । शंकर देवास येऊन म्हणती । अत्यंत मोहित ते सारे ।।३०।। शंभो तुम्ही मयूरेशासहित । अन्यत्र जावें स्थलांतरा इच्छित । दैत्यपीडेनें सतत । आम्ही झालों गुणेशास्तव ।।३१।। दैत्येंद्र मुख्य नित्य येती । मयूरेशा मारण्या कपट करती । तत्क्षणीं मरून पडती । मयूरेशमायेनें ताडित ।।३२।। जे दैत्य कपटवेष घेती ।

पशुपक्ष्यांचे ते जेव्हां मरती । तेव्हां मूळ रूप विस्तार घेती । बारा पंचवीस कोस योजनें ।।३३।। त्यांचे ते स्थूल देह पडती । तैं गृहवृक्ष आश्रम चुरडती । नित्य होत ऐसी क्षति । काय आम्हीं करावें ।।३४।। म्हणून सर्वगणांसहित । जा जेथ तुज असेल वांच्छित । अथवा आम्हीं जाऊं त्वरित । स्थान हें सोडून विवशपणें ।।३५।। त्यांचें तें ऐकून वचन । चिंतातुर शिव करी कथन । महादेवींनो जो करी पालन । देवांचें सर्वदा सर्वत्र ।।३६।। आज मीं तुमच्या आश्रमांत । आलों होतों पहाण्या हें अघटित । आमुच्या संगतीनें पीडित । खरोखर मुनी तुम्हीं ।।३७।। आपण आपापल्या आश्रमांत । रहावें सुखानें सतत । मीच जाईन अन्यत्र त्वरित । सर्व परिवारासह माझ्या ।।३८।। दैत्येंद्र नित्य मयूरेशास दुःख देत । त्यांसी तो महाबळ मारित । परी निर्विघ्नपणे राहण्या आम्हांप्रत। दुसरें कोणतें स्थान सांगा ।।३९।। त्या स्थानीं महर्षीनो जाईन । सुतासहित मीं याच क्षण । मीही ध्यान करितसे प्रतिदिन । कोठें जावें म्हणोनी ।।४०।। गौतमादी ऋषि सांगती । दक्षिण भागीं क्षेत्र निश्चिती। भूस्वानंद नामें क्षिती । सर्वसिद्धिप्रद जेणें ।।४१।। तें ब्रह्मसायुज्याचें पद । तेथ गणपति मूर्ति सुखद । सिंधदूतांनी खंडिली हें दुःखद । वृत्त आपणा विदित असे ।।४२।। त्या मूर्तीच्या ठायीं स्थापिली । सिंधूची प्रतिमा दुष्टांनी त्यावेळीं । लोकांनी ती क्षेत्रभूमि सोडली । दैत्यपीडेस्तव सह परिवार ।।४३।। जरी महादेवा तेथ जाशील । तरी विघ्नहीन तूं होशील । ऐकून त्यांचें वचन निर्मल । शंभू निघाला तत्क्षणी ।।४४।। सर्व गणांसहित जात । महादेवींनो ब्राह्मणांसहित । मयूरेशादी परिवार असत । तेव्हां त्याच्या सांगाती ।।४५।। त्या वेळीं सिंधू दानव पाठवित। कमलासुर नावाचा दैत्य बळवंत । त्यास पाहून मुनिजन पळत। अजिंक्य वाटे तो तयांसी ।।४६।। ब्रह्मा विष्णु शिवादी देवांस।

महामायिक तो अजेय त्यांस । ऐसें वाटलें तयांस । म्हणून ते पळाले ।।४७।। परी पुनरपि विचार करिती । शिवास त्यागून आश्रय जगतीं। अन्यत्र कोठे न मिळेल निश्चिती । म्हणून सर्वही परत आले ।।४८।। दैत्यनाथ जरी ठार मारील । तरी आम्हां कोण तारील । ऐशा विचारें ते विमल । शंकराचा आश्रय घेती ।।४९।। म्हणती आम्हीं भयभीत। रक्षण करी तूं सांप्रत । दैत्यनायक अति बळवंत । आतां काय करावें ।।५०।। मयूरेशाच्या संगतीत । सदा रहावें सुरक्षित । अन्यथा आम्हीं अनुग असमर्थ । संरक्षण करावया ।।५१।। त्यांचें वचन ऐकत । सदाशिव तैं भय भीत । म्हणे तो द्विजपालनरत । मुनींनो मजसी क्षमा करा ।।५२।। कमलासुर नामक दैत्यनाथ । मोठी सेना घेऊन येत । त्यास जिंकण्या असमर्थ । सर्वथैव मीं जाणा ।।५३।। आतां मजसी पकडून । टाकील कारावासीं तो दुर्जन । जेथ विष्णु आदि सुर महान। आधीच पडले संत्रस्त ।।५४।। शिवाचें ऐकून वचन । मयुरेश करी सांत्वन । म्हणे ताता नसे भयकारण । मारीन मी त्या महाअसुरासी ।।५५।। तूं साक्षात् गणनाथाचा । अंश अससी हा विचार साचा । आठवून हें तारक भवाचा । भक्तनायक तूं ख्यात ।।५६।। ब्राह्मण हे गाणपत्य असत । त्यांना विघ्न कैसें होईल प्राप्त । मरीचीनें माझ्या रक्षणार्थ । गणेशकवच दिलें असे ।।५७।। त्योयोगें मीं भयरहित । कां झालास सचिंत । ऐसें बोलून गणेश जात । विघ्नविदारण शूलधर ।।५८।। मयूरावरी बैसोनी । परशू शूल करीं धरोनी । महाघोर युद्ध करूनी । कमलासुरासी कापिलें ।।५९।। त्याचे तीन तुकडे करित । मस्तक मयूरक्षेत्रीं पडत । उदर राजसदनांत । जघन पडले प्रवाळीं ।।६०।। ऐशापरी तीन स्थानांत । दैत्येंद्राचे तीन भाग पडत । गणेश्वर झाला तेथ संस्थित । अत्यंत प्रतापवंत जो ।।६१।। मुनिजनांसह

शिवासहित । मयूरेश्वर त्या क्षेत्रीं जात । मयूरग्राम हें नाम लाभत । त्या क्षेत्रासी त्या वेळीं ।।६२।। कमलासुराचें मस्तक पडत । क्षेत्र तें तदाकार दिसत । मोर हें वाहन होतें विलसत । मयूरक्षेत्राचा हा इतिहास ।।६३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते कमलासुरवधो नामैकोनचत्वारिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणचाळिसांवा संपूर्ण)